# कानडी साहित्य परिचय

## मराठी माध्यमाच्या द्वारा

संपादक-लेखक : गु. व्यं. दिवेकर




महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ

१९७१

# कानडी साहित्य परिचय

## मराठी माध्यमाच्या द्वारा

संपादक–लेखक : गु. व्यं. दिवेकर




महाराष्ट्र राज्य साहित्य–संस्कृति मंडळ

१९७१

ज्यानी सरकारी नोकरी सोडून
साहित्य आणि संशोधनास वाहून घेतले,
त्या
**श्री. शं. बा. जोशी, साधनकेरे**
यांना अर्पण.

**किंमत रुपये ६–५०**



पहिली आवृत्ती : डिसेंबर, १९७१
(पौष, १८९३)

प्रकाशक :
सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य–संस्कृति मंडळ
सचिवालय, मुंबई–३२

मुद्रक :
केशव चौधरी
निदेशक,
आंतरभारती मुद्रणालय
२६४, ए टू झेड इंडस्ट्रीयल इस्टेट,
फर्ग्युसन रोड, लोअर परेल, मुंबई–१३.

## —: निवेदन :—

भारत हे बहुभाषी राष्ट्र आहे. भारताची राष्ट्रीय एकात्मता ही पश्चिमी देशातील 'एकराष्ट्र एकभाषा' अशा समीकरणाची नाही. येथे वैविध्यपूर्ण व साहित्यसंपन्न अशा १४ इतर भाषा आहेत. या भाषांची व साहित्याची वाढ मुख्यतः संस्कृत भाषेच्या व साहित्याच्या प्रभावाखाली झाली आहे. इंग्रजी राज्य झाल्यानंतरच्या काळात पश्चिमी संस्कृतीच्या, पश्चिमी ज्ञानाच्या व आधुनिक शिक्षणाच्या द्वारा विचार व भावना यांचे संवादित्व या भारतीय भाषांमध्ये निर्माण होऊ लागले आहे. स्वातंत्र्याच्या आंदोलनाने व राजकीय एकात्मतेमुळे या भाषांचे वैचारिक संबंध अधिक निकटचे बनले आहेत. परंतु, या भाषांचा भाषिक सीमाप्रदेश सोडल्यास, अन्योन्यसंबंध फार थोडा आहे. परंपरागत धर्म आणि इंग्लिश भाषा यांच्या द्वारेच वैचारिक, भावनात्मक व सांस्कृतिक मूल्यांची देवघेव होत आहे. ही परस्पर देवघेव मोठ्या प्रमाणात होणे आपल्या सांस्कृतिक प्रगतीचा वेग वाढविण्याच्या दृष्टीने आवश्यक आहेच. परंतु, त्याहीपेक्षा भारताची राष्ट्रीय एकात्मता दृढ व अभेद्य बनविण्याकरिता अधिक आवश्यक आहे. याकरिता, महत्त्वाचा उपाय म्हणजे प्रादेशिक मातृभाषा बोलणाऱ्या लोकसमूहांमध्ये लगतच्या किंवा दूरच्या भारतीय प्रदेशांच्या भाषा उत्तम रीतीने अवगत केलेले, त्यापैकी एक किंवा अनेक भाषा उत्कृष्ट रीतीने लिहू किंवा बोलू शकणारे आणि त्याचप्रमाणे त्या त्या अन्य प्रादेशिक भाषेतील प्रथितयश लेखांचे, ग्रंथांचे व ग्रंथकारांचे साहित्य स्वतःच्या प्रादेशिक मातृभाषेत चांगल्या रीतीने भाषांतरित व रूपांतरित करण्यास समर्थ असलेले सुशिक्षित निर्माण होण्याची मोठी निकड आहे.

ही निकड भागविण्याची पहिली पायरी म्हणून महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळाने आपली "आंतरभारती"ची योजना आखली आहे. या योजनेप्रमाणे सुशिक्षित मराठी मनुष्यास गुजराती, उर्दू, बंगाली, कानडी इत्यादी_इंडो-आर्यन व द्राविडी भाषा स्वतंत्रपणे शिकता याव्या म्हणून प्रत्येक भाषेचे द्विभाषिक शब्दकोश (दोन्ही प्रकारचे – म्हणजे गुजराती-मराठी व

मराठी-गुजराती असे ) भाषा प्रवेश आणि साहित्य-परिचय अशी चार पुस्तके प्रकाशित करण्याचे ठरविले आहे. या कार्यक्रमानुसार मंडळाच्या वतीने 'गुजराती-मराठी शब्दकोश', 'उर्दू-मराठी शब्दकोश', 'कानडी-मराठी शब्दकोश' व 'गुजराती भाषाप्रवेश' हे ग्रंथ आधीच प्रकाशित झाले असून अन्य काही भाषांचे द्विभाषिक शब्दकोश, भाषाप्रवेश व साहित्यपरिचय मुद्रणावस्थेत आहेत व काही संपादित होत आहेत.

मंडळाच्या आंतरभारती योजनेखाली तूर्त हा "कानडी साहित्य परिचय" प्रकाशित झाल्याचे जाहीर करताना मंडळास आनंद होत आहे. प्रस्तुत "कानडी साहित्य परिचय" श्री. गुरुनाथ दिवेकर यांनी मंडळासाठी संपादून तयार केला आहे. श्री. दिवेकर यांनी या "परिचया" द्वारे करून दिलेली कानडी साहित्याची ओळख मराठी वाचकांस कानडी साहित्याची जिज्ञासा उत्पन्न करण्यास उपयुक्त होईल असा आम्हांस दृढ विश्वास आहे. श्री. दिवेकर यांच्यासारख्या बहुभाषिकाने मोठ्या आस्थेने व परिश्रमपूर्वक हे काम केले ह्याबद्दल मंडळ त्यांचे आभारी आहे.

**लक्ष्मणशास्त्री जोशी**

वाई,
अध्यक्ष,

दि. ९ नोव्हेंबर, १९७१.
महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ.

# प्रास्ताविक

महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळाने आंतर भारतीसाठी तयार केलेल्या नियमानुसार हा कानडी-मराठी साहित्य परिचय सादर करतो. मराठी मातृभाषा, कानडीतून प्राथमिक व माध्यमिक शिक्षण व जीवन व्यवसाय (सरकारी नोकरी) मुंबईत अशा रीतीने कानडी व मराठी या दोन्ही भाषांचा सतत संपर्क व दोन्ही भाषांतील साहित्य वाचण्याची आवड यांच्या आधारावर मी साहित्य संस्कृति मंडळाचे आवाहन स्वीकारले. कानडी साहित्यांतील थोर कवी व लेखक यांचे प्रातिनिधिक स्वरूपाचे वेचे तयार करून ते समजण्यास सोपे व्हावेत या दृष्टीने टीपा, शब्दार्थ व कोश यथायोग्य ठिकाणी समाविष्ट केले आहेत. मुंबईसारख्या ठिकाणी कानडी साहित्याच्या अध्ययनाची साधने मर्यादित असली तरी, रूपारेल कॉलेजच्या कानडी विभागाचे प्रमुख प्रा. चिदंबर दीक्षित व इतर अनेक विद्वान स्नेही यांच्या साह्याने व सल्ल्यानुसार हा साहित्य परिचय उपयुक्त व्हावा यासाठी शक्य ते सर्व प्रयत्न संपादकाने केले आहेत.

कानडी भाषेचे ध्वनिशास्त्रीय वैशिष्ट्ये अनेक आहेत. त्यातील ठळक ठळक प्रकार असे (१) पदाचे शेवटचे अक्षर पूर्णपणे उच्चारले जाते उदा. : पाठः पाठऽऽ

(२) ए व ओ यांत ही ह्रस्व. दीर्घ आहेत. ಎ, ಏ, ಒ, ಓ, ह्रस्व एकाराचा उच्चार इंग्रजीतील '*e*' सारखा होतो. ह्रस्व 'ओ' चा उच्चार जवळ जवळ (वू) सारखा होतो या ह्रस्वदीर्घामुळे अर्थात पुष्कळ फरक होत असल्याने 'ಎ' साठी 'ऎ' व 'ಒ' साठी 'ऒ' अशी चिन्हांकित अक्षरे उपयोगांत आणली आहेत.

या कामी मला प्रोत्साहन दिल्याबद्दल व त्यामुळे साहित्याच्या सखोल अभ्यासाची संधी दिल्यामुळे मी साहित्य व संस्कृति मंडळाचा आभारी आहे. वेळोवेळी मला मदत केल्याबद्दल सौ. ललिता रामण्णा आणि माझ्या कार्यालयातील श्री. पागनीस, श्रीमती भालेराव व अन्य सहकारी यांचेही आभार मानतो.

मुंबई,
दि. १४ नोव्हेंबर १९७१.

गुरुनाथ व्यंकटेश दिवेकर

## संदर्भ ग्रंथ


| | |
|---|---|
| History of Kannada Literature | Maha Mahopadhyaya<br>R. Narasimhacharya |
| Heritage of Karnataka | Dr. R. S. Mugali |
| (कन्नड) कविश्रीमाला | हिन्दी प्रचार समिती, वर्धा |
| ಮೈಸೂರು ರಾಜ್ಯ<br>ನವಂಬರ್ ೧, ೧೯೫೬ | ಅ. ನ. ಕೃಷ್ಣರಾವ್ |
| ಕನ್ನಡ ಸಾಹಿತ್ಯದಲ್ಲಿ ಹಾಸ್ಯ | ಡಾ. ಎಂ. ಎಸ್. ಸುಂಕಾಪೂರ<br>ಕರ್ನಾಟಕ ವಿಶ್ವ ವಿದ್ಯಾಲಯ |
| ಕನ್ನಡ ಸಾಹಿತ್ಯದ ಇತಿಹಾಸ | ಡಾ. ರಂ. ಶ್ರೀ ಮುಗಳಿ<br>(ಸಾಹಿತ್ಯ ಅಕಾಡೆಮಿ) |
| ಸುವರ್ಣ ಸಂಚಯ | ಕನ್ನಡ ಅಧ್ಯಯನ ಸಂಸ್ಥೆ<br>ಮೈಸೂರು ವಿಶ್ವ ವಿದ್ಯಾಲಯ |

या शिवाय 'प्रबुद्ध कर्नाटक', कर्मवीर' या नियत कालिकांतून निवडलेले लेख.

# अनुक्रमणिका



## भाग १ ला



## भाग २ रा

## भाग ३ रा





# विषय प्रवेश

महाराष्ट्राच्या शेजारी असलेल्या कर्नाटक, आंध्र व गुजरात या तीन राज्यांमध्ये महाराष्ट्राचा कर्नाटकाशीच फार प्राचीन असा ऐतिहासिक आणि सांस्कृतिक संबध आला आहे. या दोन्ही प्रदेशांतील मोठा भाग सामाजिक चालीरीती, धार्मिकसंप्रदाय व लोकजीवनाच्या स्वरूपाच्या बाबतीत सारखा असलेला आढळतो. अशोकापासून बहमनीराज्यापर्यंत कर्नाटक, महाराष्ट्र व आंध्र ही दक्षिणेतील राज्ये एका मागून एक अशा अनेक राजघराण्यांच्या अमलाखाली होती. पैठण (शातवाहन) देवगिरी (यादव) ह्या त्यांच्या राजधान्या महाराष्ट्रांत तर द्वारसमुद्र (होय्सळ) बादामी, कल्याणी (चालुक्य), गुलबर्गा (बहामनी) ह्या राजधान्या कर्नाटकांत. यामुळे कमींत कमी दीड हजार वर्षांची सामाजिक एकात्मता सह्याद्रीच्या पठारावर नांदत होती. सध्याच्या म्हैसूर राज्याचा पाया विजयनगर साम्राज्याच्या रूपाने पडला असे समजण्यास प्रत्यवाय नाही. आदिलशाही, निजामशाही व ईमादशाही मध्ये विभागला गेलेला महाराष्ट्र शिवाजी महाराज्यांच्या स्वराज्यांत एकवटला.

शहाजी राजांनी १६३७ मध्ये विजापूरकरांच्या वतीने म्हैसूरवर स्वारी केली. तेव्हांपासून कर्नाटकांत मराठीचा प्रचार होऊ लागला.[१] शिवाजी महाराजांनी धारवाडपर्यंतचा मुलुख काबीज केला. १७५३ साली नानासाहेब पेशव्यांनी कृष्णेपासून तुंगभद्रेपर्यंत मुलुखगिरी केली. १७५७ साली सदाशिवरावभाऊने श्रीरंगपट्टणला वेढा दिल्यामुळे म्हैसूरचे १४ जिल्हे मराठ्यांना मिळाले व टिपू सुलतानाशी झालेल्या दोस्तांच्या (मराठे, इंग्रज व निजाम)च्या लढायांमुळे टिपूचे अर्धे राज्य मराठी सत्तेखाली आले. १८१८ साली पेशवाईचा अस्त झाल्यापासून १९५६ सालच्या राज्यपुनर्रचनेपर्यंत कर्नाटकाच्या मोठ्या भूभागाचा घनिष्ट संबंध महाराष्ट्राशी राहिला होता. त्यामुळे उत्तर कर्नाटकाच्या भाषिक, सामाजिक, राजकीय, शैक्षणिक व साहित्यिक जीवनावर मराठी भाषेची छाप पडलेली स्पष्ट दिसून येते. १९२० साली धारवाड येथे कर्नाटक

१. डॉ. श्रीकंठशास्त्री, "मैसूरु राज्य, नवंबर १, १९५६."

कॉलेजची स्थापना होई पर्यंत उच्च शिक्षणासाठी सुशिक्षितांना मुंबई, पुणें येथील कॉलेजांत यावे लागत असे. असे असले तरी कानडीभाषा व संस्कृती यांबद्दल मराठीजनतेला पुरेसे ज्ञान नाही. कानडीभाषा ही तामिळच्या खालोखाल अति-प्राचीन असून मागील १५०० वर्षापासून कानडीसाहित्य अस्तित्वात आहे. प्राचीन कानडी ग्रंथकारांची संख्या १००० असून आधुनिक साहित्यिक ५०० वर आहेत.२ केवळ साहित्यातच नव्हे तर शैक्षणिक, आर्थिक व औद्योगिक क्षेत्रातही म्हैसूर राज्यानें मोठी प्रगती केली आहे. दक्षिणेतील कोणत्याही राज्यापेक्षां म्हैसूरशीच जिव्हाळ्याचा संबंध येत असल्याने मराठी जनतेला कानडी भाषा व साहित्य यांबद्दल आस्था बाळगणे आवश्यक आहे. त्यांचे त्रोटक वर्णन येणे प्रमाणे.

## कर्नाटक

कर्नाटकाची म्हणजे हल्लीच्या म्हैसूर राज्याची लोकभाषा कानडी ही द्राविड कुटुंबातील भाषा असली तरी तामिळ पेक्षा अधिक संस्कृतनिष्ठ आहे म्हैसूर राज्याचा विस्तार २५,००० चौरस मैल असून लोकसंख्या २ कोटीच्या वर आहे. कर्नाटकाचा इतिहासही उज्वल असून, गोविंद, चालुक्य पुलकेसी, (बादामी) चालुक्य विक्रम या विजेत्यानी कांचीपासून कनोजपर्यंत प्रदेश पादाक्रांत केला होता. पुलकेसीच्या दरबारांत इराणचा वकील होता. कलचूरी, गंग, कदंब, राष्ट्रकूट, होइसळ या प्राचीन इतिहासांतील साम्राज्यामुळे, मध्य युगीन इतिहासांतील विजयनगर, विजापूर या राज्यांमुळे व अर्वाचीन इतिहासातील म्हैसूर संस्थानामुळे भारताच्या इतिहासांत कर्नाटकाला मोठ्या गौरवाचे स्थान प्राप्त झाले आहे. धार्मिक दृष्ट्या आदि जगद्गुरु शंकराचार्यांचे मुख्य पीठ शृंगेरी, वीरशैव लिंगायत पंथाचे संस्थापक श्री बसवप्रभु यांचे जन्मस्थान बागेवाडी ही स्थळे कर्नाटकातच आहेत. शिवाय द्वैत वेदांताचे प्रणेते श्रीमन्मध्वमुनीश्वर, ऋग्वेदाचा अर्थ लिहिणारे सायणाचार्य, विजयनगरच्या साम्राज्याचे अधारस्तंभ विद्यारण्य, कनकदास, प्रभुदेव इत्यादि संतांची मायभूमी

---

२ डॉ. रं. श्री. मुगळी, कन्नड साहित्यद इतिहास (साहित्य अकादेमी)

कर्नाटकच. श्रीवैष्णव पंथाचे संस्थापक श्री रामानुजाचार्य यानी देखील कर्नाटकांत बरेच कार्य केले.

'कर्णाट' किंवा 'कर्णाटक' या शद्वाचा उल्लेख महाभारत, वराहमिहिराची बृहत्संहिता, सोमदेवाचे कथा सरित्सागर, गुणाढ्याची बृहत्कथा या ग्रंथांतून आढळतो. दक्षिण इजिप्तमधील ऑक्सिरिंकस येथे सापडलेल्या इसवी सनाच्या दुसऱ्याशतकातील एका ग्रीक प्रहसनांत बरेचसे कानडी शद्व आले आहेत. टॉलेमी (इ. स. १५०)नेहि कर्नाटकातील अनेक शहरांचा उल्लेख केला आहे. "गाथा सप्तशती" (इ. स. २००) हेमचंद्राची "देशीनाम माला" या ग्रंथात पुष्कळ कानडी शब्द आढळतात. यावरून सामान्यपणे इसवीसनाच्या पूर्वी[१] पासून कन्नड साहित्य अस्तित्वात आहे असे म्हणण्यास काही हरकत नाही. सुरवातीला या साहित्याचे दर्शन शिलालेखातून व ताम्रपटातून घडते. हल्मिडि शिलालेख (४५० इ.)हा सर्व द्राविड भाषात प्राचीन समजला जातो. कानडीच्या प्राचीन साहित्यांत वैदिक, पौराणिक व जैन धर्मग्रंथाची व संस्कृत साहित्यातील काव्य, नाटके व काव्य लक्षण ग्रंथाची भाषांतरे व रूपांतरेच प्रामुख्याने आढळतात.

राष्ट्रकूट नृपतुंगाच्या (इ. स. ८१५-८७७) कारकिर्दीतील "कविराज मार्ग" हा सर्वात जुना उपलब्ध कन्नड ग्रंथ असून तो दंडीच्या काव्यादर्शावर आधारलेला आहे. महामहोपाध्याय आर. नरसिंहाचार्य ह्या आधुनिक काळातील ज्येष्ठ संशोधकांनी कानडी साहित्याचे ढोबळ मानाने प्राचीन कानडी (हळेगन्नड) मध्ययुगीन कानडी (नडुगन्नड) व (होसगन्नड) अर्वाचीन कानडी असे खंड काल्पिले होते. या संबंधाने मागील अर्धशतकांत बरेच संशोधन झाले असून कानडी साहित्याच्या इतिहासाबद्दल डॉ आर. एस. मुगळी यांचा ग्रंथ फार मननीय आहे. सामान्यपणे कानडी साहित्याचे असे कालखंड बहुतांशी सर्व-सम्मत आहेत.

(१) पंपपूर्व युग (इ. स. च्या सुरवातीपासून ते इ. स. ९५० पर्यंत)

---

१ गोविंद पै "मूरु उपन्यासगळु"

(२) पंपयुग (इ. स. ९५० ते इ. स. ११५० पर्यंत)
(३) बसवयुग (इ. स. ११५० ते इ. स. १५०० पर्यंत)
(४) कुमारव्यास युग (इ. स. १५०० ते इ. स. १९०० पर्यंत) व
(५) आधुनिक युग (इ. स. १९०० पासून पुढे)

## १० व्या शतकातील कवी

आदिकवि पंप (इ. स. ९४१) हा जैन मताचा अनुयायी ब्राह्मण चालुक्य अरिकेसरी (द्वितीय) याच्या आश्रयास होता. त्याने कानडी काव्यांत "चंपू" शैली रूढ केली म्हणून या युगास चंपू युगही म्हणतात. त्याचे ग्रंथ "विक्रमार्जुन विजय" व "आदि पुराण" हे प्रसिद्ध आहेत. कविकुलगुरु म्हणून त्याचा गौरव केला जातो.

" पसरिप कन्नडक्कोडेयनोर्वने सत्कवि पंपनावगं "

[ पंप हा विशाल कन्नड भाषेचा एकछत्र आणि शाश्वत सम्राट आहे ] असे कविनागराजाने त्याचे वर्णन केले आहे. त्याची काव्य शैली त्याच्याच शद्बांत "हित-मित मृदुवचन, प्रसन्न गंभीर वचन रचन चतुर कोमल सुभग सूक्तिगर्भ मृदुसंदर्भ विचार क्षम, श्राव्य " अशी आहे.

पंपानंतरचे पोन्न (इ. स. ९५०) व कवि चक्रवर्ती रन्न (९९०) हे दोघेही जैन कवीच होते. रन्नाचे "गदायुद्ध" भासाच्या 'ऊरूभंग' व भट्ट नारायणाच्या "वेणीसंहारा" इतकेच प्रौढ व लालित्यपूर्ण आहे. चाऊंडराय (इ. स. ९७५) हा देखील थोर जैन कवी व स्थापत्य विशारद होता. श्रवणबेळगोळातील गोमटेश्वराची अत्युन्नत जगत् प्रसिध्द मूर्ती त्यानेच बनविलीं. नागवर्मा याने चंपूशैलींत बाणभट्टाच्या कादंबरीचे कानडी रूपांतर केलें. व छंदोबुधी हा छंदोरचनेवर ग्रंथही लिहिला.

## ११ व्या शतकातील कवी

दुर्गसिंह (इ. स. १०३०), शांतिनाथ (इ. स. १०६१) व श्रीधराचार्य

(इ. स. १०५०) ह्या कवीनी पंपाच्या चंपू शैलीतच काव्य रचना केली. नागचंद्र किंवा 'अभिनव पंप' याचे पंपरामायण काव्य विशेष उल्लेखनीय आहे.

या युगांतच जैन मताशिवाय इतर मताच्या साहित्यकांर्नाही कानडी वाङ्मयाच्या वाढीस हात भार लावला. ओघानेच याचा एक परिणाम असा झाला की जैन मताबद्दलचा समाजातील पूर्वीचा आदर कमी होत चालला व तो पुनः प्रस्थापित करण्यासाठी जैन साहित्यिकांनी प्रचारात्मक साहित्याची निर्मिती केली. यामुळे या काळातील वाङ्मयावर परस्पर टीकेची व उपरोधाची छाप पडली आहे. नयसेनाचा "धर्मामृत" व ब्रह्मशिवाचा "समय परीक्षे" हे ग्रंथ या काळातील वाङ्मयाचे नमुने समजले जातात.

## बाराव्या शतकातील साहित्य

इसवी सनाच्या बाराव्या शतकापासून कानडीला आगळेच स्थान प्राप्त झाले. दक्षिणेतील समतेचे पहिले थोर उद्गाते व वीरशैव लिंगायत मताचे प्रवर्तक श्री बसवेश्वर (मु. इ. स. ११५०) यांनी कानडी मध्ये आपली 'वचने' लिहिली. या वचनांमध्ये वीरशैव मताच्या तत्वांची सरळ व मार्मिक मांडणी केली गेली असून ती वचने गद्यांत असली तरी गेय आहेत. बसवेश्वरां व्यतिरिक्त अल्लमप्रभु, महासती अक्क महादेवी, चन्नबसव व सिध्दराम हेहि थोर वचनकार होत. वचन साहित्याचे एक वैशिष्ट्य म्हणजे 'शिवशरणांच्या' भक्तीची ती एक गाथाच आहे. प्रत्येक शिवशरण आपल्या वचनांच्या शेवटी आपल्या आराध्य दैवताचे नाव घेत असतो. म्हणजे तुकाराम, नामदेव यांच्या अभंगांत जसे 'तुका म्हणे' 'नामा म्हणे' असे प्रयोग असतात त्यां ऐवजी वचनात आराध्य दैवताला उद्देशून "कूडल संगम देव (बसवेश्वर)" "गुहेश्वर" (अल्लम प्रभू), "चन्नमल्लिकार्जुन" (अक्क महादेवी) अशी संबोधने आढळतात.

बसवण्णांच्या काही वचनांचे नमुने येथे पहा :-

"देवनोब्ब, नाम हलवु, परम पतिव्रतेगे गंड नोब्ब. मत्तोंदक्केरगिदोडे किविमूग कोय्युवनु. हलवु दैवद अेन्जल तिन्नुवरनेनेबैनय्य, कूडल संगम देव"

[देव एकच. नावे अनेक. पतिव्रतेला नवरा एकटाच. दुसऱ्या कोणाची उपासना केल्यास तो नाक, कान कापतो. अनेक देवांचे उष्टे खाणारांस मी काय म्हणावे. कूडल संगम देवा]

“आरु मुनिदरे नमगेनु माडुवरु ?
ऊरु मुनिदरे ऒम्मनेनु माडुवुदु
आनेय मेले होहवन श्वान कच्च बल्लुदे
नमगे नम्म कूडल संगम देवनुळ्ळनक”

[कोण रुसला तर तो आम्हास काय करणार आहे ? सारे गाव जरी आम्हावर रागावले तरी ते काय करणार ! कूडल संगमदेव आमच्या पाठीशी आहे तो पर्यंत हत्तीवरून चाललो असताना कुत्री आम्हास काय करू शकतील ?]

अक्क महादेवी ही कानडी साहित्यातील पहिली थोर स्त्री वचनकार व साध्वी होय. गद्यात्मक वचनांशिवाय तिने “युगांग तिविदि” हे काव्य आणि अनेक पदे रचिली आहेत.

अक्क महादेवीच्या उत्कट शिवभक्तीची ओळख तिच्या ह्या स्वतःच्या वर्णनावरून होऊ शकते.

पुरुषन मुंदे माये स्त्री ऎम्ब अभिमानवागि काडित्तु नोडा ! स्त्रीय मुंदे माये पुरुषनेंब अभिमानवागि काडित्तु नोडा ! लोकवेंब मायॆगे शरण चारित्र मरुळागि तोरुवुदु नोडा ! चेन्नमल्लिकार्जुननोलिद शरणरिगे माये इल्ल मरहिल्ल अभिमानवू इल्ल.

पच्चेय नेलगट्टु कनकदतोरण, वज्रद, कंभ, पवळद चप्परवन्निक्कि मुत्तु माणिकद मेलुकट्ट कट्टि मदुवेय माडिदरू. नम्मवरेन्न मुदुवेय माडिदरू. कंकण कैदोर स्थिर सेसेयन्निक्कि, चेन्नमल्लिकार्जुननेंब गंडंगेन्न मदुवेय माडिदरू.

जलद मंडपद मेले उरिय चप्परवन्निक्कि, अलिकल्ल हसेय हासि कालिल्लद हेन्डतिगे तलोयिल्लद गंड मदुवेयादनु, अेन्देदु बिडद बाळुवेगे कोट्टरेन्न, चेन्नमल्लिकार्जुननेम्ब गंडंगेन्न मयुवेय माडिदरू.

[ माया ही पुरुषापुढे स्त्री म्हणून व स्त्रीपुढे पुरुष म्हणून प्रगट होते. चारित्र्यवान शरणांगत देखील ह्या भवमोहिनीला वश होतात. पण ज्या शरणांगताला चेन्नमल्लिकार्जुनाची कृपा लाभते त्याला माया, मोह, अभिमान यांचा उपसर्ग पोहोचत नाही.

हिऱ्या मोत्याच्या महालांत मला दागिन्यांनी मढवून आमच्या लोकांनी माझे चेन्नबसेश्वराशी लग्न लावले.

पाण्याच्या मांडवावर आगीचे छप्पर व अशा मांडवांत लंगड्या नवरीशी बिनडोक्या नवरदेवाचे लग्न झाले. कधी न सुटणारा जीवनाचा व्याप माझ्या गळ्यात पडला. चेन्नमल्लिकार्जुन नावाच्या नवरदेवाशी माझे लग्न झाले.]

बसवेश्वर व इतर शिवशरणांच्या साहित्याने प्रेरित होऊन काही कानडी कवींनी 'रगळे' 'षट्पदि' 'त्रिपदि' 'सांगत्य' इत्यादि देशीय वृत्तांत काव्य निर्मिती केली. या कवीत हरिहर राघवांक (१२००) हे प्रमुख होत. हरिहराने चंपू काव्यात "गिरिजा कल्याण" "पंपाशतक" "रक्षाशतक" हे ग्रंथ लिहिले आहेत. "रगळे" या वृतांत "नूरोदु शिवशरणर चरित्रेगळु" हा ग्रंथ रचिला आहे. हरिहराने पूर्वी क्वचितच वापरांत असलेल्या रगळे वृत्ताचा आपल्या दीर्घ काव्यांतून उपयोग केला. तो हंपे येथील विरूपाक्षाचा मोठा भक्त होता व त्याच्या काव्यांत उत्कट शिवभक्ति व प्रसन्न शैली आढळते.

राघवांक हा त्याचा भाचा होता. तोहि विरूपाक्षाचा भक्त होता. "हरिश्चन्द्र काव्य", "सिद्धराम पुराण", "वीरेश्वर चरित्रे", "शरभ चरित्र", "हरिहर महत्व" ही पांच काव्ये त्यानीं लिहिली असून हरिश्चंद्र चरित्र फार लोकप्रिय आहे. यातील हरिश्चंद्राची कथा ऐतरेय ब्राह्मणातील किंवा क्षेमेंद्राच्या "चण्डकौशिक" नाटकातील कथेपेक्षा वेगळी आहे. या काव्यांत

हरिश्चंद्राचा उल्लेख शिवभक्त म्हणून केला गेला आहे आणि तो हर आणि सत्य यांतील अभेद पटवून देतो. हे काव्य 'वार्द्धिक षट्पदि' या वृत्तांतात असून राघवांक हा या वृत्ताचा जनक समजला जातो.

## तेरावे व चौदावे शतक

तेराव्या शतकात जैन कवींनी उत्तम काव्य निर्मिती करून आपली परंपरा राखली. जन्न (सु. १२२५) या कवीने "अनंतनाथ पुराण" हे महा-काव्य व "यशोधर चरित्रे" हे खंडकाव्य लिहिले. अंडय्य कवीचे "कब्बिगर काव" हे चंपूशैलीतील काव्य वैशिष्टयपूर्ण आहे. जन्नाचाच एक कुटुंबीय "मल्लिकार्जुन" याने कानडी वाङ्मयातील पहिला काव्य संग्रह "सूक्तिसुधार्णव" रचला व त्याचा मुलगा केशिराज याने शब्द मणिदर्पण हा अधिकृत व्याकरण ग्रंथ लिहिला.

## पंधराव्या शतकांतील विष्णुभक्तिचे साहित्य

प्रारंभीच्या जैन व नंतरच्या वीरशैव साहित्याबरोबरच विष्णुभक्तिप्रचुर साहित्याची निर्मिती होऊ लागली. नरहरितीर्थ, व्यासराय आदि आचार्यांच्या लोकजागृतीमुळे एका नव्या साहित्य प्रकारास चालना मिळाली. या काळां-तील अग्रगण्य कवी कुमारव्यास (नारणप) (इ. स. सु. १४३०) याने लिहिलेला "कर्नाट भारत कथा मंजरि" किंवा "गदुगिन भारत" हा ग्रंथ अत्यंत लोकप्रिय आहे. त्याने आपल्या ग्रंथाची ओळख अशी करून दिली आहे.

अरसुगळिगिदु वीर परमवेदद सार
योगीश्वरर तत्त्वविचार मंत्रिजनके बुद्धिगुण
विरहिगळ शृंगार विद्यापरिणतरलंकार
काव्यके गुरूवेनलु रचिसिद कुमारव्यास
भारतव ॥

[ राजे लोकांना यात वीर रस आढळेल. यांत श्रेष्ठ वेदांचे सार सापडेल. मंत्रीजनांना यांतून बौद्धिक विचार घेता येतील. योगीश्वरांसाठी यांत तत्त्वचर्चा आहे. विरहीजनांच्या विरंगुळ्यासाठी यांत श्रृंगाररस भरपूर आहे.

विद्याविभूषितांना हा एक अलंकारच वाटेल. अशा प्रकारे कुमार व्यासाने काव्यास गुरु होऊ शकेल असा हा ग्रंथ लिहिला आहे. ]

याच काळांत देवराज व चामरस असे थोर कवी उदयास आले. चामरसाचा "प्रभुलिंगलीले" हा योगीश्वर प्रभुदेवाच्या चरित्रावर आधारलेला ग्रंथ फार प्रसिद्ध असून त्याचा मराठींत अनुवाद झाला आहे. रूद्रभट्टाचे "जगन्नाथ विजय" हे चंपूशैलीतील पहिले महाकाव्य आहे. त्याच प्रमाणे विरूपाक्ष पंडिताचे "चैन्नबसवपुराण" विद्वन्मान्य आहे.

## सोळाव्या शतकांतील साहित्य

कुमार व्यासाचा भारत ग्रंथ इतका लोकप्रिय झाला की त्यापासून काव्य रचना करण्यास अनेक कवींना प्रेरणा मिळाली. कुमार वाल्मीकि (इ. स. १५५०) यानें 'तोरवे रामायण" लिहिले. चाटुविठ्ठलनाथाचे "भागवत", लक्ष्मीशा (१५५०)चे "जैमिनी भारत" किंवा "श्रीकृष्ण चारितामृत" हे याच शैलीतील ग्रंथ होत.

कुमार व्यासानंतर कर्नाटकातील लोकजीवनांत क्रांती घडवून आणणारे हरिदास आणि कीर्तनकार उदयास आले. महाराष्ट्रांत विठ्ठलभक्तीचा प्रसार जसा तुकारामाने केला त्याप्रमाणे कर्नाटकांत व दक्षिणेत पुरंदरदासाने प्रसार केला. पुरंदरदास (इ. स. १५५०) यांची पुरंदर विठ्ठलाच्या भक्तीची अत्यंत रसाळ "कीर्तने" लोकप्रिय झाली. या परम नादमधुर व गेय कीर्तनांमुळे ते कर्नाटक संगीताचे पितामह म्हणून ओळखले जातात.

पुरंदरदासांचे चरित्र मनोरंजक आहे. पुण्याजवळील पुरंदरगडांत सावकारी करत असलेल्या श्रीनिवास नायकाला उपरती झाली व तो विजयनगरातील माध्व पीठाधीश व्यासराय यांच्या अनुग्रहाने "पुरंदरदास" बनला. यांच्या कीर्तनांव्यतिरिक्त "सुळादि" आणि "उगाभोग" हे साहित्य ही प्रसिध्द आहे.

पुरंदरदासांचा संप्रदाय पुढे चालविणारे मोठे कवी श्रीपाददास, विजयदास, गोपालदास व जगन्नाथदास हे होत. कनकदासाची "कागीनेलैयादिकेशवा"स उद्देशून रचिलेली कीर्तने पुरंदरदासांच्या कीर्तना इतकीच मार्मिक व बोधप्रद आहेत. त्या शिवाय त्याने "मोहन तरंगिणि" हे भक्तिकाव्य, "नळचरित्रे", "रामधान्य चरित्रे", "हरिभक्तिसार" असे महत्वाचे ग्रंथ लिहिले आहेत.

इ. स. १५६५ साली रक्कसतंगडीच्या लढाईत पराजय झाल्यामुळे कर्नाटकाच्या उज्वल परंपरेला अवकळा प्राप्त झाली. नंतरच्या काळांत साहित्यांत उल्लेखनीय अशी भर पडली नाही. तरी देखील "निजगुण शिवयोगि", "मुप्पिन षडक्षरि", "सर्वज्ञ" या थोर कवींनी साहित्य ज्योत तेवत ठेवली. सर्वज्ञाची वचने व्यावहारिक स्वरूपाची असून जनसमान्याच्या भाषेंत रूढ झाली आहेत.

## सतराव्या शतकातील साहित्य

सतराव्या शतकाच्या प्रारंभी म्हैसूर राज्य अस्तित्वांत आले. चिक्कदेवराय हा राजा स्वतः कवी होता व अनेक कवींना त्याने आश्रय दिला. तिरूमलार्य, सिंगिराज, चिक्कुपाध्याय या कवींनी चरित्रपर व अलंकार विषयक ग्रंथ लिहिले. राजवाड्यांतील एक परिचारिका 'होन्नम्मा' हिचे "हदिबदेय धर्म" हे पातिव्रत्याच्या महिमेबद्दलचे काव्य लालित्यपूर्ण आहे.

## आधुनिक साहित्य

आठराव्या व एकोणिसाव्या शतकांत इंग्रजी सत्ता प्रस्थपित झाल्यामुळे देशांत जुन्या परंपरेचा ऱ्हास व नव्या पश्चिमाभिमुखी संस्कृतीचा उदय झाला. कर्नाटकाचा फार मोठा भाग, मुंबई राज्य, हैद्राबाद संस्थान व मद्रास राज्यांत समाविष्ट झाला होता व फक्त म्हैसूर संस्थानच एकमेव संपूर्ण कानडी राज्य होते. याचा परिणाम असा झाला की या भागांतील लोकांचे शिक्षण, व्यवहार, बोलणे एकमेकापासून वेगळे होत गेले. या काळांत साहित्यिक व भाषाविषयक

कार्य ख्रिस्ती मिशनऱ्यानी केले. रे. रीव्ह व काइटेल यांनी कानडी भाषेचा सांगोपांग अभ्यास करून जुन्या साहित्याच्या परिशीलनाची बरीच सोय करून ठेविलीं. बी. एल राईसच्या 'एपिग्राफिया कर्नाटिका' च्या प्रकाशनाने बरीच लोक जागृति झाली व सुशिक्षितांमध्यें आपला इतिहास व भाषा यांबद्दल कुतूहल निर्माण झाले. या काळांतील साहित्याच्या इतिहासाचा आढावा घेण्यासाठी प्रांतनिहाय प्रगतीचा उलेख करणे अपरिहार्य आहे.

म्हैसूर राज्यांत मुम्मडि (तिसऱ्या) कृष्णदेवराय या राजाने नव्या स्वरूपाच्या साहित्य निर्मितीस उत्तेजन दिलें, व त्या मुळे जुन्या व नव्या साहित्य परंपरा व संकेतांचा मिलाफ होऊ लागला. केंम्पु नारायणाने विशाखादत्ताच्या मुद्राराक्षसावर आधारलेली 'मुद्रामंजूष' ही कादंबरी लिहिली. जुन्या आणि नव्या साहित्याच्या संगमाचा भव्य देखावा 'मुद्दण' (नडलिंगे लक्ष्मीनारणप्पा) च्या रामाश्वमेध या गद्य काव्यात पाहावयास सापडतो. यात उत्तर रामचरित्राची कथा पतिपत्नी संवादाच्या स्वरूपात आलेली आहे. अद्भुत रामायण, रामपट्टाभिषेक या काव्य ग्रंथा व्यतिरिक्त याने कानडी साहित्याचे वैशिष्टय समजल्या जाणाऱ्या 'यक्षगानां (लोकनाट्य)' ची निर्मिती केली आहे.

पूर्वीच्या मुंबई प्रांतातील कर्नाटकाच्या भागात नव्या पद्धतीच्या शिक्षणाची सुरवात इ. स. १८५१ मध्ये झाली व प्रारंभीच्या काळात कानडी जिल्ह्यांतून मराठी शाळा स्थापन झाल्या. पुढे कानडी ही मराठी पेक्षा वेगळी भाषा आहे हे लक्षात आल्यावर १८६५ पासून कानडी शाळा अस्तित्वात येत गेल्या. तरी देखील लोकजीवनाची जडणघडण बहुतांशी मुंबई राज्यातील इतर भागासारखीच विशेषतः महाराष्ट्रीयांसारखीच होती. सामाजिक, भाषाविषयक, शैक्षणिक, साहित्यिक व राजकीय बाबतीत पुणें आणि मुंबई हीच स्फूर्तिस्थाने झाली. नव्या पद्धतीचे शिक्षण, वंगभंग, होमरूल व कॉंग्रेसच्या चळवळी, एकीकरण परिषद, कर्नाटक विद्यावर्धक संघ व कानडी साहित्य परिषद यांच्या परिणामाने कानडी साहित्याबद्दल लोकांत आवड निर्माण झाली.

मद्रासराज्यातील कर्नाटकाच्या भागांत बासेल मिशनने पुस्तके व वृत्तपत्रे छापून वृत्तपत्र व्यवसाय व साहित्य प्रकाशनाची मुहूर्तमेढ केली.

१९व्या शतकाच्या शेवटी व २० व्या शतकाच्या पहिल्या पंचवीस वर्षांत जी साहित्य निर्मिती झाली तिचे स्वरूप बहुतांशी अनुवाद किंवा रुपांतराचे होते. त्यानंतरच्या काळांत मात्र कर्नाटकाच्या एकात्मतेची जाणींव होत गेली व वेगवेगळ्या भागांत एकमेकाबद्दल असलेले औदासीन्य पार लुप्त झाले. भाषा व साहित्य यांत फार मोठी प्रगती झाली आणि साहित्याच्या सर्व अंगांत सतत व मौलिक निर्मिती होऊ लागली. नव्या युगाचे प्रमुख मानकरी बसप्पशास्त्री, एस. जी. नरसिंहाचार्य, धोंडोनरसिंह मुळबागिल, शांत कवि (बाळाचार्य सक्री), बी. वेंकटाचार्य, गोविंद पै व महामहोपाध्याय आर. नरसिंहचार्य हे होत.

## पद्य साहित्य

नव्या साहित्यांत काव्य निर्मितीचा पाया डी. व्ही. गुंडप्पा, बी. एम. श्रीकंठय्या, मास्ति व्यंकटेश अयंगार, पंजे मंगेशराव, द. रा. बेंद्रे, साली रामचंद्रराव, आनंदकंद, व्ही. सीतारामय्या आणि मधुर चन्न या ज्येष्ठ साहित्यिकानी घातला. बी. एम. श्रीकंठय्या (श्री)नी पालग्रेव्हच्या गोल्डन ट्रेझरीतील बऱ्याच कवितांची इतकी सहज सुंदर पद्यांत भाषांतरे केली की थोड्याच कालावधींत त्यानीं लोकांच्या मनाची पकड घेतली. 'कानडी राणीचे अलंकार इंग्रजी राणीला व इंग्रजी राजकन्येचे दागिने कानडीला चढवून त्याचा आनंद मनसोक्त लुटणे हेच 'श्री'चे (बी. एम. श्रीकंठय्या)यांचे ध्येय होते. भाषांतराव्यतिरिक्त 'श्री'नी ग्रीक शोकांतिकांना अनुरूप असलेले 'अश्वत्थामन्' हे नाटकहि लिहिले आहे. पंजे मंगेशरावानी आपल्या सहज सुंदर कवितांनी बालसाहित्याचा पाया रचला व त्यामुळे आबालवृद्धांत साहित्याच्या अभ्यासाबद्दल आस्था उत्पन्न झाली. त्यांची ही एक कविता पाहा

नागर हावे ! हावोळु हूवे
बागिल बिलदलि निन्नय ठावे ?
कैगळ मुगिवे, हालन्नीवे
बा, बा, बा, बा, बा, बा, बा, बा.

बरिमै तण्णगे मनदलि बिसिहगे
ऎरडॆळॆ नालगे इद्दुदु सुम्मगे
ऎरगुवे निनगे ईगळे होरगे
पो, पो, पो, पो, पो, पो, पो, पो.

[नागोबा ! तू सापात श्रेष्ठ फूल, तुझे घर दरवाज्यापाशी बिळात आहे. मी तुला हात जोडतो, दूध देतो, तू ये, येच ! (व त्यानंतर)

तुझे अंग जरी थंडगार असले तरी तुझ्या मनांत गरम वैर आहे, तुला जिभा दोन असून हि ते फुक्कट आहे, तुझ्या पाया पडतो. तू आताच एकदम बाहेर निघून जा.]

महाकवि बेंद्रे व त्यांच्या गेळेयर गुंपु (मित्र मंडळा)तील श्रेष्ठ साहित्यिकांनी कानडी पद्य व गद्य साहित्यास नवे स्वरूप दिले, नवे संकेत रूढ केले व साहित्य समीक्षेचे नवे मानदंड निर्माण केले. द. रा. बेंद्रे (अंबिकातनय दत्त) यानी बोलीभाषेच्या शैलीत विसाव्या शतकातील जागतिक पातळीवरील वैचारिक क्रांतीचे दर्शन घडविणारी काव्य निर्मिती केली.

या नंतरच्या पिढींत के. वी. पुट्टप्पा (कु. वें. पु.) पु. ति. नरसिंहाचार्य, राजरत्नं, शंकरभट्ट, के. एस. नरसिंहस्वामी, गोपाळकृष्ण अडिग चन्नवीर कणवी व दिनकर देसाई, विनायक (प्राध्यापक के. व्ही. गोकाक) आणि रसिक रंग यांची नांवे उल्लेखनीय आहेत. 'कुवेंपु' नी विद्यार्थी दशेतच साहित्य साधनेस सुरवात केली व अनेक इंग्रजी कवितांचे कानडी अनुवाद केले. Pied Piper of Hemlin या खंड काव्याचे 'बोम्मन हळ्ळिय किंदरि जोगि' हे त्यांनी केलेले रूपांतर नितांत रम्य असून मूळ कविते येवढेच प्रभावी आहे. श्री कुवेंपु हे कवी व तत्त्वज्ञानी आहेत. त्यानी आपल्या 'चित्रांगदा' व 'रक्ताक्षी' या सारख्या कृतीनी कानडी साहित्यात बहुमोल भर टाकली आहे. त्यांच्या "श्रीरामायण दर्शन" या महाकाव्याला राष्ट्रपती-पदक मिळाले आहे. यां शिवाय ते कादंबरीकार, समीक्षक व प्रबंधकार म्हणूनहि प्रसिद्ध आहेत.

कानडी गद्य वाङ्मयांत देखील या काळीं विपुल भर पडत होती.

## लघुकथा

केरूर वासुदेवाचार्य, पंजे मंगेशराव, मास्ती वेंकटेश अय्यंगार, आनंद, आनंदकंद, गोरूर रामस्वामी अयंगार, अ. न. कृष्णराव, राजरत्नं, टेंगसे या जुन्या पिढीतील साहित्यिकांनी लघुकथा या कांही अंशी नव्या साहित्य प्रकारांत यश मिळविले. 'मास्तींची सुब्बण्ण' ही कथा प्रसिद्ध आहे. त्यांच्या या क्षेत्रातील साधनेमुळें त्यांना लघुकथा साहित्याचे जनक म्हणून ओळखले जाते. प्रचलित काळी अनेक ख्यातनाम तरूण लेखकांच्या दर्जेदार लघुकथा मासिकांतून व स्वतंत्रपणे प्रसिद्ध होत आहेत.

## कादंबरी

सुरवातीच्या काळांत भाषांतरेच प्रसिद्ध होत असत. म्हैसूरराज्यांत बी. व्यंकटाचार्यांनी बंगाली साहित्यातून बंकिमचंद्राची "आनंद मठ" कादंबरी कानडींत आणली. वेंकटेश तिरको कुलकर्णी तथा गळगनाथ यांनी ह. ना. आपटे यांच्या काही कादंबऱ्यांची भाषांतरे केलीच पण त्याशिवायहि त्यांनी स्वतंत्र लिखाणहि केले. अगडी येथे शेषाचल प्रेस मधून "सद्बोधचंद्रिके" व "सद्गुरु" अशी मासिके त्यानी चालविली व त्यायोगे अनेक तरुण साहित्यिकांना विविध प्रकारचे लेखन करण्यास वाव मिळाला. श्री. गळगनाथांची बहुमोल कामगिरी म्हणजे त्यांनीं लोकांत साहित्य वाचनाची गोडी निर्माण केली व कानडी भाषेला व अभिव्यक्तीला नवे रूप प्रदान केले. पुढील काळांत कर्नाटक विद्यावर्धक संघाच्या "वाग्भूषणांत" व म्हैसूर विश्वविद्यालयाच्या "प्रबुद्ध कर्नाटकांत" उच्चकोटीचे साहित्य प्रसिद्ध होत गेले. केरूर वासुदेवाचार्यांनीहि आपल्या 'सद्धर्मा'तून व स्वतंत्र रुपाने कादंबऱ्या व विनोदी साहित्य प्रकाशित केले. गेल्या तीस वर्षापासून मनोहर ग्रंथमालेंतहि अनेक वाचनीय कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत. शिवराम कारंत, के. व्ही. पुट्टप्पा, आनंद कंद, अ. न. कृष्णराव, त. रा. सु, बसवराज कट्टीमनी, व्ही. एम. इनामदार, कृष्णमूर्ती

पुराणीक, मिर्जी अण्णाराय, निरंजन, त्रिवेणी अनुपमा, उषादेवी, व्यासराव बल्लाळ, राममूर्ती, के. व्ही. आय्यर, कुलकरणी बिंदु माधव, सीताराम शास्त्री, मास्ती वेंकटेश अय्यंगार व देवुडु हे कानडीतील अग्रगण्य कादंबरीकार होत. "श्री विनायक" (प्रा. व्ही. के. गोकाक यांच्या "इज्जोडु" विषम विवाह) या कादंबरीत बुद्धिजीवी वर्गाच्या वैवाहिक जीवनांतील समस्यांची चर्चा केलेली आढळते. यशवंत चित्ताल यांची "मूरूदारि: गळु' शांतिनाथ यांची "मुक्ति", श्री. शंकर मोकाशी यांची "गंगव्व मत्तु गंगामायि" व श्री. भैरप्पा यांची "वंश वृक्ष" ह्या कादंबऱ्या कथावस्तु व निरूपण शैलीच्या दृष्टीने पूर्ण स्वतंत्र व आधुनिक आहेत.

## निबंध साहित्य

साहित्यातील निबंध हा एक व्यापक स्वरूपाचा प्रकार असून त्यांत लेखकाचा आदर्श, ज्ञान व मांडणीचे कौशल्य यावरून निबंधांचे मूल्यांकन होते. कानडी साहित्यात कृष्णशास्त्री चिपळूणकरांच्या निबंधमाले सारखे लिखाण विशेष आढळत नाही. तरी देखील श्री गोविंद पै, पंजे मंगेशराव, ए. एन कृष्णमूर्तिराव, प्रा. अ. तु. सासनूर, तिरूमले ताताचार्य शर्मा, एस. व्ही. रंगण्णा, व्ही. सीतारामय्या, शिवराम कारंत वगैरे ज्येष्ठ साहित्यिकानी हा साहित्यप्रकार उत्तम रीतीने हाताळला आहे. इतिहास, भाषा, राजकीय परिस्थिती या विषयांत आलूर वेंकटराव, एस. कृष्णशर्मा, शं. बा. जोशी, प्रा. गोकाक यानीं विपुल व दर्जेदार लेखन केले आहे. त्याच प्रमाणे मुळ्ळये तिम्मप्पय्या, फ. गु. हळकट्टी, रंगराव दिवाकर, डी. एन. नरसिंहाचार्य, सिद्दव्वन हळ्ळीकृष्णशर्म्मा, यांचे सांस्कृतिक जीवनावरील निबंध मननीय आहेत. द. बा. कुलकर्णी यांनी व्यक्तिचित्रणाचा यशस्वी प्रयोग केला आहे.

## नाटक

सिंगारार्य (१७००) याचे "मित्रविंद गोविंद" हे श्री हर्षाच्या 'रत्नावलि'-चे भाषांतर कानडीतील सर्वात जुने उपलब्ध नाटक होय. म्हैसूरचे महाराज

चामराज ओडेयर हे मोठे साहित्यप्रेमी होते व त्यांचे आस्थान कवी बसवप्पशास्त्री, सुब्बाशास्त्री, अनंत नारायण शास्त्री, अय्याशास्त्री, गिरिभट्टर तम्मय्या यांनी संस्कृत व इंग्रजी नाटकांची भाषांतरे त्यांच्यासाठी बनविली. विद्वान वेंकटाचार्य, नंजनगूडु श्रीकंठशास्त्री, बेळ्ळावे नरहरिशास्त्री यांनी काही स्वतंत्र नाटके लिहिली. उत्तर कर्नाटकात वामनराव मास्तर यांनी गडकरी, खाडिलकर, मामा वरेरकर यांच्या नाटकांची कानडी रूपांतरे बनवून ती रंगमंचावर आणली. त्याचप्रमाणे गरूड सदाशिवराव यांनीहि, 'पादुका पट्टाभिषेक' या सारखी स्वतंत्र नाटके लिहून बसविली. हुयिलगोळ नारायणराव यांनी स्त्री धर्मरहस्य हे स्वतंत्र सामाजिक नाटक लिहिले. शेक्सपियरच्या नाटकांची सुंदर भाषांतरे श्री केरूर वासुदेवाचार्यांनी केली.

आधुनिक नाटकतंत्राचे प्रणेते, कै. टी. पी. कैलास हे होत. विनोद प्रचुर विडंबनात्मक व चिंतनात्मक नाटकांची सुरवात त्यांच्या टोळ्ळुगट्टि (खरे-खोटे)या नाटकापासुन झाली (१९१८). पुढील अठ्ठावीस वर्षांत (मृ.१९४७) त्यांनी, बंडवाळ विल्लद बदाई (बिनभांडवली थापा) "होंरूलु" "अम्मावगंड (बाईचे यजमान) गंडस्कत्री (जहांबाजबाई) वगैरे सामाजिक नाटके लिहिली. टी. पी. कैलास हे स्वतः अभिनयपटु होते व त्यामुळे सुशिक्षित समाजांत नाटक, नट यांना मानाचे स्थान मिळू लागले. त्याच्या 'कर्ण,' 'परपज' ह्या शोकांतिका (Tragedies) व 'बहिष्कार', 'ब्रह्मणके', 'हुत्तदल्लि हुत्त' (ब्रह्म-घोटाळा) ही प्रहसने, गंभीर व लोकप्रिय आहेत.

'श्रीनिवास' (मास्तीं वेंकटेश अय्यंगार) यांनी समाज जागृतीसाठी 'शांता', 'सावित्री', 'उषा', 'ताळी कोटे', 'शिवछत्रपती', 'मंजुळा', 'यशोधरा', 'काकन कोटे' इत्यादि श्रेष्ठ प्रतीची नाटके रचली. शिवराम कारंत या अष्टपैलु साहित्यिकाने ही 'नारदन गर्वभंग', 'गर्भगुडि' 'हणेबरह' (नशीब) 'कट्टेपुराण' (गच्चीवरिल गप्पा) 'नाल्कनेय पिशाचि' (चवथे भूत) 'जंबद जानकि' (डौलाची जानकी) ही सामाजिक नाटके लिहिली व त्यांचे प्रयोग केले.

म्हैसूरच्या इतिहासावर आधारलेली 'संस' यांची नाटके, श्री. बी. एम्. श्रीकंठय्या यांची 'गदायुद्ध', 'अश्वत्थामन्' 'पारसीकरू' व के. व्ही. पुट्टप्पा यांची

'रक्ताक्षि', 'विरूगाळि' (तुफान), श्री. अ. न. कृष्णराव यांचे "मदुवेयो मने हाळो' हे नाटक. श्री. एम्. आर. श्री यांची 'नागरिक', 'धर्मदुरन्त' ही नाटके अभिजात व विचारप्रवर्तक ठरली आहेत.

श्री. टी. पी. कैलास यांच्या प्रमाणेंच उत्तर कर्नाटकांत श्री. आद्य रंगाचार्य (आर. व्ही. जहागीरदार) यांनी जनमनाची पकड घेणारी, विनोदप्रचुर नाटके लिहून अनेक सामाजिक व राजनैतिक प्रश्नांवर आपली निर्भीड मते व्यक्त केली. त्यांच्या 'वैद्यराज', 'नरकदल्लि नरसिंह', 'प्रपंच पाणिपत्तु', 'हरिजन्वार' (द्वयर्थी (१) हरिजनवार (२) जानवे तोडून टाक)' या नाटकांतून समाजांत रूढ असलेल्या ढोंगीपणाचे व सर्वत्र पसरलेल्या असह्य अगतिकतेचे यथार्थ चित्रण आढळते. जुन्या आदर्शवादी विचारांची जळमटे साफ पुसून काढून वास्तववादी विचारप्रवाह निर्माण करणारी त्यांची 'उदर वैराग्य', मुक्कण्ण विराट पुरुष' 'पार्थ प्रतिज्ञे', 'अश्वमेध', 'शरपंजर', 'शोकचक्र' ही नाटके त्यांच्या मूलगामी विचारसरणींची साक्ष पटवितात. उत्तर कर्नाटकांत श्री. आद्यरंगाचार्य यांच्या नाटकानी संपादलेल्या लोकप्रियतेची जाणीव इतरांनी त्यांच्या तंत्रांचे व कोट्यांचे अनुकरण करून लिहिल्या गेलेल्या नाटक-नाटिकांवरून होते. श्री. एन्. के. कुलकर्णी यांची 'इलेक्शन्' 'नडुमनेयल्लि' ही छोटी प्रहसने, श्री. वेंद्रे लक्ष्मणराव यांची "बायबडाई (थापा)" जूजु (जुगार) 'भाग्यश्री' 'मदुवेय पत्तल' (लग्नाचे पातळ' डॉ. रं. श्री. मुगळी यांचे 'मोटरमारिका', प्रा. गोकाकांचे 'विमर्शक वैद्य' ही नाटके या दृष्टीने उल्लेखनीय आहेत. या शिवाय 'नगेमारि' 'बीचि' या नाटककारांनीहि नाटक साहित्यांत नवीन तंत्रे उपयोगांत आणिली आहेत.

श्री. ए. व्ही. सीतारामय्या ह्यानी म्हटल्याप्रमाणे स्वातन्त्र्योत्तर काळातील वाङमय निर्मितीचे ढोबळ मानाने तीन भाग पाडता येतील (१) स्वातन्त्र्य प्राप्तीपूर्वी पाश्चात्य साहित्याच्या प्रभावाने आकर्षिले जाऊन आधुनिक साहित्य संप्रदाय स्थापणारे जुने साहित्यिक व त्यांचे अनुकरण करणारे तरूण लेखक. (२) जुनेच तंत्र आदर्शवादाऐवजी लोकरंजनासाठी राबविणारे लेखक (३)

वरील दोन्ही प्रकार बाजूस सारून चाळीस पन्नास वर्षापूर्वी उदयास आलेल्या ('आधुनिकतावादाचा) 'नव्यपंथ' (modernism) चा ध्यास घेणारे नवकवी 'कुवेंपु' (रामायण दर्शन), 'डीव्हीजी' (मंकु तिम्मन कग्ग), मास्ती (नवरात्रि), डॉ. द. रा. बेंद्रे (अरळु मरळु), 'विनायक' (द्यावी पृथिवी), डॉ. रं. श्री. (अपारकरूणे), 'पुतिनं (रससरस्वति). 'वीसी' (द्राक्षि दाळिंबे) हे पहिल्या वर्गातील साहित्यिक. मराठी व भारतातील इतर भाषांमधील 'नियतकालिक' साहित्यही कानडीमध्ये लोकप्रिय होत आहे. या वर्गात मनोविश्लेषणात्मक, गूढ, लैंगिक 'डिटेक्टिव्ह' व याच प्रकारचे 'क्षोभक' साहित्य मोडते. या शिवाय ईलियट व एझ्रापौंड यांच्या पासून स्फूर्ती घेऊन निर्मिलेले साहित्य व तसेच अगदी अलिकडचे 'प्रगतिशील' साहित्यही झपाट्याने लोकप्रिय होत आहे.

## साहित्य समीक्षा

इंग्रजी साहित्याच्या अध्ययनामुळे नव्या आणि जुन्या साहित्याचे मूल्यांकन करण्याची जी प्रवृत्ती भारतातील अनेक भाषांतून दिसून येते ती या शतकाच्या सुरवातीपासून कानडी साहित्यांतही उदयास आली व तिचे नेतृत्व गोविंद पै, पंजे मंगेशराव, श्रीकंठय्या, डॉ. डी. व्ही. गुंडप्पा, टी. एस. वेंकण्णय्या यांनी केले. द. रा. बेंद्रे, 'कुवेंपु' ति. न. श्रीकंठय्या, व्ही. सीतारामय्या, प्रा. व्ही. के. गोकाक, व्ही. आर. कृष्णशास्त्री. एस. व्ही. रंगण्णा, शेडियापु कृष्ण भट्ट यांनी विमर्शेचे दालन विशेष सजविले. महामहोपाध्याय आर. नरसिंहाचार्य यांनी कानडी साहित्याचा इतिहास प्रसिद्ध केला. डॉ. रं. श्री. मुगळी यांनी 'Heritage of Karnatak' व "कन्नड साहित्यद इतिहास" हे ग्रंथ लिहून साहित्याच्या अभ्यासकांना मोलाचे सहाय्य केले.

## चरित्र

चरित्र साहित्यांत डॉ. डी. व्ही. गुंडप्पा यांचे 'गोखले चरित्र' व कुवेंपु यांचे 'विवेकानंद चरित्र हे उल्लेखनीय ग्रंथ होत. आत्मचरित्रांत शिवराम कारंतांचे "हुच्चु मनस्सिन हत्तुमुखगळु" (वेड्या मनाचे दहा मुखवटे) बरेच

नावाजलेले आहे. शिवाय नियतकालिकांतून श्री. द. रा. बेंद्रे, रंगराव दिवाकर इत्यादि ज्येष्ठ पुढाऱ्यांची आत्मचरित्रे त्रोटक स्वरूपांत प्रसिद्ध होत असतात.

## शास्त्रीय साहित्य

सामान्य जनतेला विज्ञानाची माहिती करून देण्यासाठी श्री. हणमंत राव, यू. एल. आचार्य, के. एस. लक्ष्मणराव, के. विठ्ठल शेणै, जी. टी. नारायण-राव यानीं ग्रंथरचना केली आहे. अष्टपैलु साहित्यिक श्री. शिवराम कारंत यांनी 'बाल प्रपंच', 'विज्ञान जगत्तु' हे विश्वकोश प्रसिद्ध केले आहेत. श्री. शं. बा. जोशी यांनी कानडी व मराठी या दोन्ही भाषांतून भाषाशास्त्र, व्युत्पत्ती इत्यादि विषयांवर मननीय व संशोधनात्मक विचार मांडले आहेत. "कर्णन मूर--चित्र गळु (कर्णाची तीन रूपे), 'यक्ष प्रश्न', 'असंतोषवे एळगेय मूल' (असंतोष हाच उत्कर्षाचा पाया) हे त्यांचे कांही उद्बोधक व विचारप्रवर्तक ग्रंथ होत.

## बृहत्कर्नाटकांतील साहित्यिक

मागील पन्नास वर्षांत कानडी साहित्याबद्दल सुशिक्षित वर्गांत आस्था निर्माण झाली असून कर्नाटकाबाहेर व्यवसायामुळे गेलेल्या लेखकांनीही साहित्यांत बहुमोल भर टाकली आहे. कृष्णकुमार कल्लूर, दिनकर देसाई, व्यासराव बल्लाळ, चिदंबर कवी (प्रा. चिदंबर दीक्षित), वाय. व्ही. चित्ताल, श्रीनिवास हावनूर व कानडी आणि इंग्रजी भाषेत समान अधिकाराने काव्यरचना करणारे श्री शंकर मोकाशी हे बृहत्कर्नाटकातील श्रेष्ठ साहित्यिक होत. याच प्रमाणे बी. देवराव, गंगाधर चित्ताल, हेमंत कुलकर्णी, मानवी नरसिंगराव, एच. एस. पाटील वै. रंगनाथ नेगळूर, सौ. ललिता रामण्णा या लेखकांनी व कवींनी नव्या साहित्याच्या निर्मितीलां हातभार लावला आहे.

—( ० )—

# मॊदलनॆय पाठ

## तॆन्नाली रामकृष्ण

भाषा कन्नड लिपी देवनागरी

उत्तर भारतदल्लि बीरबल्लनु इद्दंते दक्षिणदल्लि तॆन्नाली रामकृष्णनु विनोद मूर्ति. अवनु विजयनगरद अरसन आश्रयदल्लि इद्दनु. ऒम्मे अरसनु सभेयन्नु नॆरॆयिसिदनु. दॊड्डदॊड्ड पंडितरु सभॆगॆ बंदरु. अवर हत्तिर दॊड्डदॊड्ड ग्रंथगळु इद्दवु. अवरु तम्म तम्म ग्रंथगळ आशयवन्नु तिळिसि हेळिदरु. रामकृष्णनिगॆ अनिसितु "नानू ऒंदु ग्रंथ तरबेकु." अवनु मनॆगॆ होदनु. कॆलवु ऎम्मॆ कट्टिगॆगळन्नु ऎम्मॆ कट्टुव हग्गदिंद बिगिदु कसूति तॆगॆद वस्त्रदल्लि कट्टि कॊंडु सभॆगॆ बंदनु. अल्लिय जनरिगॆ रामकृष्णनन्नु नोडि आश्चर्यवु आयितु. "इवनु ऎनु तंदिद्दाने?" ऎंदु अवरिगॆ कुतुहलवु उंटाइतु. "नीनु ऎनु तंदिरुवि" ऎंदु अवनन्नु केळिदरु. अवनु तट्टने उत्तर कॊट्टनु: "नानुतिलकाष्ट महिष बंधन" ऎम्ब ग्रंथवन्नु तंदिद्देने. "अदरल्लि यावयाव संगतिगळु इवॆ?" ऎन्दु अवरु मत्ते केळिदरु. तॆन्नाली रामकृष्णनु उत्तर कॊट्टनु "इदरल्लि ऎल्ल संगतिगळु इवॆ. ऎम्मॆ कट्टिगॆगळु इवॆ. ऎम्मॆ कट्टुव हग्गवु इदॆ. बिगिदु कट्टिद गंटु इदॆ. तिलकाष्ट महिषबंधन ऎन्दरॆ ऎम्मॆकट्टुव हग्गदिंद ऎम्मॆ कट्टिगॆ गळन्नु कट्टि गंटु हाकुवुदु"

तॆन्नाली रामकृष्णन नगॆमातन्नु केळि ऎल्लरू खॊळ्ळनॆ नक्करु.

# ಮೊದಲನೆಯ ಪಾಠ

## ತೆನ್ನಾಲೀ ರಾಮಕೃಷ್ಣನು

ಉತ್ತರ ಭಾರತದಲ್ಲಿ ಬೀರಬಲ್ಲನು ಇದ್ದಂತೆ ದಕ್ಷಿಣ ಭಾರತದಲ್ಲಿ ತೆನ್ನಾಲೀ ರಾಮಕೃಷ್ಣನು ವಿನೋದ ಮೂರ್ತಿ. ಅವನು ವಿಜಯನಗರದ ಅರಸನ ಆಶ್ರಯದಲ್ಲಿ ಇದ್ದನು. ಒಮ್ಮೆ ಅರಸನು ಸಭೆಯನ್ನು ನೆರೆಯಿಸಿದನು. ದೊಡ್ಡ ದೊಡ್ಡ ಪಂಡಿತರು ಸಭೆಗೆ ಬಂದರು. ಅವರ ಹತ್ತಿರ

ದೊಡ್ಡ ದೊಡ್ಡ ಗ್ರಂಥಗಳು ಇದ್ದವು. ಅವರು ತಮ್ಮ ತಮ್ಮ ಗ್ರಂಥಗಳ ಆಶಯವನ್ನು ತಿಳಿಸಿ ಹೇಳಿದರು. ರಾಮಕೃಷ್ಣನಿಗೆ ಅನಿಸಿತು: "ನಾನೂ ಒಂದು ಗ್ರಂಥ ತರಬೇಕು." ಅವನು ಮನೆಗೆ ಹೋದನು. ಕೆಲವು ಎಳ್ಳಿನ ಕಟ್ಟಿಗೆಗಳನ್ನು ಎಮ್ಮೆ ಕಟ್ಟುವ ಹಗ್ಗದಿಂದ ಬಿಗಿದು ಕಸೂತಿತೆಗೆದ ವಸ್ತ್ರದಲ್ಲಿ ಕಟ್ಟಿಕೊಂಡು ಸಭೆಗೆ ಬಂದನು. ಅಲ್ಲಿಯ ಜನರಿಗೆ ರಾಮಕೃಷ್ಣನನ್ನು ನೋಡಿ ಆಶ್ಚರ್ಯವು ಆಯಿತು. "ಇವನು ಏನು ತಂದಿದ್ದಾನೆ?" ಎಂದು ಅವರಿಗೆ ಕುತೂಹಲವು ಉಂಟಾಯಿತು. "ನೀನು ಏನು ತಂದಿರುವಿ?" ಎಂದು ಅವರು ಅವನನ್ನು ಕೇಳಿದರು. ಅವನು ತಟ್ಟನೆ ಉತ್ತರ ಕೊಟ್ಟನು: "ನಾನು 'ತಿಲಕಾಷ್ಠ ಮಹಿಷ ಬಂಧನ' ಎಂಬ ಗ್ರಂಥವನ್ನು ತಂದಿದ್ದೇನೆ." ಅದರಲ್ಲಿ ಯಾವ ಯಾವ ಸಂಗತಿಗಳು ಇವೆ?" ಎಂದು ಅವರು ಮತ್ತೆ ಕೇಳಿದರು. ತೆನ್ನಾಲೀ ರಾಮಕೃಷ್ಣನು ಉತ್ತರ ಕೊಟ್ಟನು: ಇದರಲ್ಲಿ ಎಲ್ಲ ಸಂಗತಿಗಳು ಇವೆ. ಎಮ್ಮೆ ಕಟ್ಟುವ ಹಗ್ಗವು ಇದೆ. ಬಿಗಿದು ಕಟ್ಟಿದ ಗಂಟು ಇದೆ. 'ತಿಲಕಾಷ್ಠ ಮಹಿಷ ಬಂಧನ' ಎಂದರೆ ಎಮ್ಮೆ ಕಟ್ಟುವ ಹಗ್ಗದಿಂದ ಎಳ್ಳಿನ ಕಟ್ಟಿಗೆಗಳನ್ನು ಕಟ್ಟಿ ಗಂಟು ಹಾಕುವುದು."

ತೆನ್ನಾಲೀ ರಾಮಕೃಷ್ಣನ ನಗೆಮಾತನ್ನು ಕೇಳಿ ಎಲ್ಲರೂ ಘೊಳ್ಳನೆ ನಕ್ಕರು.

# धडा १ ला

## तेन्नाली रामकृष्ण

### भाषांतर

उत्तर भारतात बिरबल होता त्या प्रमाणे दक्षिणेत तेन्नाली रामकृष्ण हा विनोदमूर्ती होता. तो विजयनगरच्या राजाच्या आश्रयास होता. एकदा राजाने सभा बोलावली. मोठे मोठे पंडित सभेला आले. त्यांच्या जवळ मोठे मोठे ग्रंथ होते. त्यानी आपापल्या ग्रंथाचा आशय समजावून सांगितला. रामकृष्णाला वाटले : "मी देखील एक ग्रंथ आणावा." त्याने घरी जाऊन काही तिळाच्या काठ्या म्हैस बांधण्याच्या दोराने बांधल्या व तो भरतकाम केलेल्या

कपड्यांत त्या बांधून घेऊन सभेस आला. तेथील लोकांना त्यास पाहून आश्चर्य वाटले. 'त्याने काय आणले आहे' असे त्यांस कुतुहल वाटले. "तू काय आणले आहेस" असे त्यांनी त्यास विचारले. त्याने चटकन् उत्तर दिले "मी तिलकाष्ठ महिष बंधन या नावाचा ग्रंथ आणला आहे." "यांत कोण कोणते विषय आहेत" असे त्यांनी पुन्हा त्यास विचारले. तेन्नाली रामकृष्णाने उत्तर दिले "यांत सर्वगोष्टी आहेत. तिळाच्या काठ्या आहेत. म्हैस बांधण्याचा दोर आहे. "तिलकाष्ठ महिष बंधन' म्हणजे म्हैस बांधण्याच्या दोराने बांधलेल्या तिळाच्या काठ्या."

तेन्नाली रामकृष्णाचा विनोद ऐकून सभेतील लोकांत हशा पिकला!

**उच्चार** ( १ ) शेवटचा ' अ 'कार पूर्ण उच्चारला जातो उदाः ಪಾಠ–पाठ
ಎ : अॆ, ಐ : ऐ, ಒ : ऑ, ಓ : ओ

## व्याकरण

१ नानुः मीः नानू ( ऊ ) : मी देखील. रामनु. राम. रामनू : राम सुद्धा (ऱ्हस्व) उकारा ऐवजी (दीर्घ) ऊकार वापरल्यास "देखील", असा अर्थ होतो.

२ (रामनु) मत्तु कृष्णनुः } राम आणि कृष्ण.
रामनू कृष्णनू }

' ऊ ' काराचा अर्थ ' आणि ' असा होतो. त्या संदर्भात ' मत्तु (आणि) हा शब्द अनावश्यक आहे.

## शब्द संग्रह

| | | |
|---|---|---|
| अनिसितु | ಅನಿಸಿತು | वाटलें |
| अरसु ( अरसनु ) | ಅರಸು (ಅರಸನು) | राजा (राजाने) |
| अल्लदे | ಅಲ್ಲದೆ | शिवाय |
| अंते | ಅಂತೆ | (क्रियाविशेषण) सारखे |

| | | |
|---|---|---|
| अंथ | ಅಂಥ | ( विशेषण ) सारखे |
| आदरू | ಆದರೂ | तरीदेखील |
| आयितु | ಆಯಿತು | झाले. |
| इद्दितु | ಇದ್ದಿತು | होते ( भूतकाळ नपुसकलिंगी ) |
| उंटाइतु | ಉಂಟಾಯಿತು | उत्पन्न झाले |
| ऍम्मे | ಎಮ್ಮೆ | म्हैस |
| ऍल्लरिगे | ಎಲ್ಲರಿಗೂ | सर्वांना |
| ऍळ्ळु | ಎಳ್ಳು | तीळ |
| ऍन्दु | ಎಂದು | असे (म्हणून) |
| ऍम्ब | ಎಂಬ | या नावाचा |
| ऑब्बनु | ಒಬ್ಬನು | एकजण |
| ऑम्मे | ಒಮ್ಮೆ | एकदा |
| कट्टिकॉन्डु | ಕಟ್ಟಿಕೊಂಡು | बांधून घेऊन |
| कट्टिगे | ಕಟ್ಟಿಗೆ | लाकूड, काठी |
| कट्टुव | ಕಟ್ಟುವ | बांधण्याचा |
| कुळितनु | ಕುಳಿತನು | बसला |
| केलवु | ಕೆಲವು | काही |
| केळि | ಕೇಳಿ | ऐकून |
| केळिदरु | ಕೇಳಿದರು | विचारले (भूतकाळ अनेकवचन) |
| कॉट्टनु | ಕೊಟ್ಟನು | दिले (त्याने) |
| गंटु | ಗಂಟು | गाठ |
| गंटु हाकुवुदु | ಗಂಟು ಹಾಕುವುದು | गाठ घालणे |
| तट्टने | ತಟ್ಟನೆ | लगेच |
| तम्मतम्म | ತಮ್ಮ ತಮ್ಮ | आपापले |
| तरबेकु | ತರಬೇಕು | आणावा |
| तंदिद्दाने | ತಂದಿದ್ದಾನೆ | आणला आहे |
| तंदिरुवि | ತಂದಿರುವಿ | आणला आहेस |
| तिळिसि हेळु | ತಿಳಿಸಿಹೇಳು | समजावून सांगणे |
| नगॅमातु | ನಗೆಮಾತು | विनोद |
| निजवागि | ನಿಜವಾಗಿ | खरोखर |
| नेरॅयिसु | ನೆರೆಯಿಸು | ( सभा ) बोलावणे |

| | | |
|---|---|---|
| नोडि | ನೋಡಿ | पाहून |
| बिगिदु | ಬಿಗಿದು | आवळून |
| बंदरु | ಬಂದರು | आले |
| बिच्चि | ಬಿಚ್ಚಿ | उघडून |
| सरति | ಸರತಿ | पाळी |
| सलुवागि | ಸಲುವಾಗಿ | साठी |
| संगति | ಸಂಗತಿ | विषय—हकीकत |
| डग्ग | ಡಗ್ಗ | ढोर |
| होदनु | ಹೋದನು | गेला |



# ऎरडनेय पाठ

**नाटकवु**

भाषा कन्नड            लिपी देवनागरी

नमगे नाटकवु बहळ सेरुत्तदे. अदक्कागि नावु अदन्नु तोडलिक्के नाटयगृहक्के होगुत्तेवे. अदरल्लि केलस माडुववरु नाटक कंपनिय नटरु.

इदु नाटकगृह. इल्लि नाटक सिनेमा मुंताद कार्यक्रमगळु नडेयुत्तवे. ईग नोडिरि ! पडदे एळुत्तदे. नाटकवु प्रारंभवागुत्तदे. एल्लनटरु ऒट्टिगे सेरि प्रार्थने माडुत्तारे. हाडु मुगियुत्तदे. एल्लरू होरटु होगुत्तारे. ईग मत्तॊंदु पडदे बीळुत्तदे. सूत्रधारनू नटियू रंगमंचद मेले बरुत्तारे. अवरु नाटकद विषयवागि संभाषणे माडुत्तारे. बळिक अवरू इब्बरू होरटु होगुत्तारे, "सुभद्राहरण" ऎंबदु ई नाटकद हेसरु.

बलरामनु तन्न तंगि सुभद्रेयन्नु दुर्योधननिगे कॊडुवुदन्नु निश्चयिसुत्ताने सुभद्रेयु अदक्के ऒप्पुवुदिल्ल. कृष्णनु सुभद्रेगे बेंबल कॊडुत्ताने. अवनु दुर्योधनन बदलागि अर्जुननिगे सुभद्रेयन्नु कॊडुव बगॆगे योचिसुत्ताने, अवनु अर्जुनन बळिगे होगि अवनिगे संन्यासिय वेषवन्नु धरिसलिक्के हेळुत्ताने. अर्जुननु ऒप्पुत्ताने अवरिब्बरु द्वारकेगे बरुत्तारे. अर्जुननु द्वारकेय होरगे कूडुत्ताने. कृष्णनु सुभद्रेगे सन्यासियन्नु भेट्टियागलिक्के हेळुत्ताने. सुभद्रेयु अर्जुनन समीप बरुत्ताळे. अर्जुननु तट्टने अवळन्नु हिडिदुकॊळ्ळुत्ताने. अवनु अवळन्नु तन्न रथदल्लि कूडिसिकॊंडु रथवन्नु वेगदिंद नडेसुत्ताने, अवरु होदमेले कृष्णनु आनंद बडुत्ताने.

ई संगति बलरामनिगे तिळियुत्तदे अवनु सुभद्रेय मेले कोपिसुत्ताने. कृष्णन मेले सिट्टिगेळुत्ताने. आमेले बलरामनिगे कृष्णनु ऒळ्ळेय उद्देशदिंद ई नाटकवन्नु रचिसिदुदु तिळिदु बरुत्तदे. अवनु नगुत्ताने. ऎल्लरिगू संतोषवागुत्तदे.

इल्लिगे नाटकवु मुगियुत्तदे. मत्तॊम्मे एल्ल नटरू ऒट्टिगे सेरुत्तारे. अवरु भरतवाक्यवन्नु हाडुत्तारे.

तेरे बीळुत्तदे. नावेल्लरू एळुत्तेवे. "नाटक चन्नागिदे". ऎन्नुत्त नम्म नम्म मनेगे होगुत्तेवे.

# ಎರಡನೆಯ ಪಾಠ

## ನಾಟಕವು

ನಮಗೆ ನಾಟಕವು ಬಹಳ ಸೇರುತ್ತದೆ. ಅದಕ್ಕಾಗಿ ನಾವು ಅದನ್ನು ನೋಡಲಿಕ್ಕೆ ನಾಟ್ಯಗೃಹಕ್ಕೆ ಹೋಗುತ್ತೇವೆ. ಅದರಲ್ಲಿ ಕೆಲಸ ಮಾಡುವವರು ನಾಟಕ ಕಂಪನಿಯ ನಟರು.

ಇದು ನಾಟಕಗೃಹ. ಇಲ್ಲಿ ನಾಟಕ, ಸಿನೇಮಾ ಮುಂತಾದ ಕಾರ್ಯಕ್ರಮಗಳು ನಡೆಯುತ್ತವೆ. ಈಗ ನೋಡಿರಿ! ಪಡದೆ ಏಳುತ್ತದೆ. ನಾಟಕವು ಪ್ರಾರಂಭವಾಗುತ್ತದೆ. ಎಲ್ಲ ನಟರು ಒಟ್ಟಿಗೆ ಸೇರಿ ಪ್ರಾರ್ಥನೆ ಮಾಡುತ್ತಾರೆ. ಹಾಡು ಮುಗಿಯುತ್ತದೆ. ಎಲ್ಲರೂ ಹೊರಟು ಹೋಗುತ್ತಾರೆ. ಈಗ ಮತ್ತೊಂದು ಪಡದೆ ಬೀಳುತ್ತದೆ. ಸೂತ್ರಧಾರನೂ ನಟಿಯೂ ರಂಗಮಂಚದ ಮೇಲೆ ಬರುತ್ತಾರೆ. ಅವರು ನಾಟಕದ ವಿಷಯವಾಗಿ ಸಂಭಾಷಣೆ ಮಾಡುತ್ತಾರೆ. ಬಳಿಕ ಅವರು ಇಬ್ಬರೂ ಹೊರಟು ಹೋಗುತ್ತಾರೆ. "ಸುಭದ್ರಾಹರಣ" ಎಂಬದು ಈ ನಾಟಕದ ಹೆಸರು.

ಬಲರಾಮನು ತನ್ನ ತಂಗಿ ಸುಭದ್ರೆಯನ್ನು ದುರ್ಯೋಧನನಿಗೆ ಕೊಡುವುದನ್ನು ನಿಶ್ಚಯಿಸುತ್ತಾನೆ. ಸುಭದ್ರೆಯು ಅದಕ್ಕೆ ಒಪ್ಪುವುದಿಲ್ಲ. ಕೃಷ್ಣನು ಸುಭದ್ರೆಗೆ ಬೆಂಬಲ ಕೊಡುತ್ತಾನೆ. ಅವನು ದುರ್ಯೋಧನನ ಬದಲಾಗಿ ಅರ್ಜುನನಿಗೆ ಸುಭದ್ರೆಯನ್ನು ಕೊಡುವ ಬಗೆಗೆ ಯೋಚಿಸುತ್ತಾನೆ. ಅವನು ಅರ್ಜುನನ ಬಳಿಗೆ ಹೋಗಿ ಅವನಿಗೆ ಸನ್ನ್ಯಾಸಿಯ ವೇಷವನ್ನು ಧರಿಸಲಿಕ್ಕೆ ಹೇಳುತ್ತಾನೆ. ಅರ್ಜುನನು ಒಪ್ಪುತ್ತಾನೆ. ಅವರಿಬ್ಬರೂ ದ್ವಾರಕೆಗೆ ಬರುತ್ತಾರೆ. ಅರ್ಜುನನು ದ್ವಾರಕೆಯ ಹೊರಗೆ ಕೂಡುತ್ತಾನೆ. ಕೃಷ್ಣನು ಸುಭದ್ರೆಗೆ ಸನ್ನ್ಯಾಸಿಯನ್ನು ಭೆಟ್ಟಿಯಾಗಲಿಕ್ಕೆ ಹೇಳುತ್ತಾನೆ. ಸುಭದ್ರೆಯು ಅರ್ಜುನನ ಸಮೀಪ ಬರುತ್ತಾಳೆ. ಅರ್ಜುನನು ತಟ್ಟನೆ ಅವಳನ್ನು ಹಿಡಿದುಕೊಳ್ಳುತ್ತಾನೆ. ಅವನು ಅವಳನ್ನು ತನ್ನ ರಥದಲ್ಲಿ

ಕೂಡಿಸಿಕೊಂಡು ರಥವನ್ನು ವೇಗದಿಂದ ನಡೆಸುತ್ತಾನೆ. ಅವರು ಹೋದ ಮೇಲೆ ಕೃಷ್ಣನು ಆನಂದಬಡುತ್ತಾನೆ.

ಈ ಸಂಗತಿ ಬಲರಾಮನಿಗೆ ತಿಳಿಯುತ್ತದೆ. ಅವನು ಸುಭದ್ರೆಯ ಮೇಲೆ ಕೋಪಿಸುತ್ತಾನೆ. ಕೃಷ್ಣನ ಮೇಲೆ ಸಿಟ್ಟಿಗೇಳುತ್ತಾನೆ. ಆ ಮೇಲೆ ಬಲರಾಮನಿಗೆ ಕೃಷ್ಣನು ಒಳ್ಳೆಯ ಉದ್ದೇಶದಿಂದ ಈ ನಾಟಕವನ್ನು ರಚಿಸಿದುದು ತಿಳಿದುಬರುತ್ತದೆ. ಆತನು ನಗುತ್ತಾನೆ. ಎಲ್ಲರಿಗೂ ಸಂತೋಷವಾಗುತ್ತದೆ.

ಇಲ್ಲಿಗೆ ನಾಟಕವು ಮುಗಿಯುತ್ತದೆ. ಮತ್ತೊಮ್ಮೆ ಎಲ್ಲ ನಟರೂ ಒಟ್ಟಿಗೆ ಸೇರುತ್ತಾರೆ. ಅವರು ಭಾರತವಾಕ್ಯವನ್ನು ಹಾಡುತ್ತಾರೆ.

ತೆರೆ ಬೀಳುತ್ತದೆ. ನಾವೆಲ್ಲರೂ ಏಳುತ್ತೇವೆ. "ನಾಟಕ ಚೆನ್ನಾಗಿದೆ" ಎನ್ನುತ್ತ ನಮ್ಮ ನಮ್ಮ ಮನೆಗೆ ಹೋಗುತ್ತೇವೆ.

# धडा २ रा

## नाटक

भाषांतर

आम्हाला नाटक फार आवडते. ते पाहण्यास आम्ही नाटकगृहांत जातो. त्यात काम करणारे नाटककंपनीतील नट असतात.

हे नाट्यगृह. येथे नाटक सिनेमा वगैरे कार्यक्रम चालतात. आता पाहा. पडदा उचलला जातो. नाटक सुरू होते. सर्व नट एकत्र येऊन प्रार्थना करतात. गाणे संपते. सगळेच निघून जातात. आता दुसरा एक पडदा पडतो. सूत्रधार आणि नटी रंगमंचावर येतात. ते नाटकाविषयी संभाषण करतात. त्यानंतर ती दोघेही निघून जातात. "सुभद्राहरण हरण" असे या नाटकाचे नाव आहे.

बलराम आपली बहीण सुभद्रा हिला दुर्योधनाला देण्याचा निश्चय करतो. सुभद्रा त्याला कबूल होत नाही. कृष्ण सुभद्रेला पाठिंबा देतो. तो

सुभद्रेला दुर्योधनाऐवजी अर्जुनाला देण्याचा विचार करतो. तो अर्जुनाकडे जाऊन त्यास संन्याशाचा वेष धारण करण्यास सांगतो. अर्जुन कबूल होतो. ते दोघे द्वारकेस येतात. अर्जुन द्वारकेच्या बाहेर बसतो. कृष्ण सुभद्रेला संन्याशाचे दर्शन घ्यावयाला सांगतो. ती अर्जुनाच्या जवळ जाते. तो तिला एकदम पकडतो. तिला आपल्या रथात बसवून घेऊन रथ वेगाने चालवितो. ती गेल्यानंतर कृष्णाला आनंद होतो.

ही हकीकत बलरामाला कळते. तो सुभद्रेवर रागावतो. त्याला कृष्णाचा राग येतो. त्यानंतर बलरामास कळून येते की कृष्णाने चांगल्या हेतूने ते नाटक रचले होते. त्याला हसू येते. सगळ्यांना आनंद होतो.

येथे नाटक संपते. पुन्हा एकदा सर्व नट एकत्र येतात व भरत वाक्य गातात.

पडदा पडतो. आम्ही सर्व उठतो. नाटक छान आहे असे म्हणत आपापल्या घरी जातो.

## व्याकरण : संधी

स्वरसंधी : दोन स्वर एकत्र आले असता पहिल्या स्वराचा लोप होतो.

अबरु + इब्बरु : अवरिब्बरु.
आनंदवु + आगुत्तदे : आनंदवागुत्तदे.
नावु + ऒंल्लरु = नावॊंल्लरु.

व्यंजन संधी : जोड शब्दांत दुसऱ्या शब्दाच्या पहिल्या अक्षरा ऐवजी तिसरे वर्गीय अक्षर येते.

आनंद + पडुत्तारे = आनंदबडुत्तारे.
मने + केलस = मनेगेलस.
दय + तोरु = दयदोरु.

## शब्द संग्रह

| | | |
|---|---|---|
| अदक्कागि | ಅದಕ್ಕಾಗಿ | त्यासाठी |
| आमेले | ಆಮೇಲೆ | त्यानंतर |
| इब्बरु | ಇಬ್ಬರು | दोघे |
| इल्लि | ಇಲ್ಲಿ | येथे |
| इल्लिगे | ಇಲ್ಲಿಗೆ | याठिकाणी |
| ऍन्नुत्त | ಎನ್ನುತ್ತ | म्हणत |
| ऍंबदु | ಎಂಬದು | यांनावाचे |
| एळु | ಏಳು | उठणे |
| ऑट्टिगे | ಒಟ್ಟಿಗೆ | एकत्र |
| ऑप्पु | ಒಪ್ಪು | कबूल होणे |
| कूडिसु | ಕೂಡಿಸು | बसविणे |
| केलवु | ಕೆಲವು | काही |
| केलस | ಕೆಲಸ | काम |
| कोडुवुदन्नु | ಕೊಡುವುದನ್ನು | देण्याचे |
| कोपिसु | ಕೋಪಿಸು | रागावणे |
| चन्नागि (क्रि. वि.) | ಚನ್ನಾಗಿ | छान, चांगले, |
| तन्न | ತನ್ನ | आपले |
| तिळियु | ತಿಳಿಯು | समजणे |
| तेरे | ತೆರೆ | पडदा |
| नडेसु | ನಡೆಸು | चालवणे |
| नोडु | ನೋಡು | पाहणे |
| नोडिरि | ನೋಡಿರಿ | ( तुम्ही ) पाहा |
| बगेगे | ಬಗೆಗೆ | बद्दल-विषयी |
| बदलागि | ಬದಲಾಗಿ | ऐवजी |
| बरु | ಬರು | येणे |
| बळिक | ಬಳಿಕ | नंतर |
| बीळु | ಬೀಳು | पडणे |
| बेंबल | ಬೆಂಬಲ | पाठिंबा |
| मत्तॊन्दु | ಮತ್ತೊಂದು | दुसरा एक |
| मुगि | ಮುಗಿ | संपणे |

